केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियान
अकोला शहराच्या मलनिःस्सारण प्रकल्पास
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगरविकास विभाग
शासन निर्णय क्रमांक अमृत-२०२३/प्र.क्र.१२७/नवि-३३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : ०६ एप्रिल, २०२३**

संदर्भ :-

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. अमृत-२०१५/प्र.क्र.१९७/नवि-३३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
२. नगर विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: अमृत-२०१६/प्र. क्र.१६३/नवि- ३३, दिनांक १६ मे, २०१६ व १२ जुलै, २०१६.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र: अमृत-२०१७/प्र.क्र.२४४/नवि- ३३, दिनांक २३ मे, २०१७.

प्रस्तावना :-

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाची संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सन २०१५-१६ वर्षापासून अंमलबजावणी करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, मलनिःस्सारण, पर्जन्य जलवाहिनी, नागरी परिवहन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती अभियान शहरांमध्ये करण्यात येत आहे. त्यानुसार या अभियानांतर्गत संदर्भाधीन क्र. ३ अन्वये अकोला शहराच्या मलनिःस्सारण प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर अभियानांतर्गत अकोला शहराच्या मलनिःस्सारणप्रकल्पाचे काम पूर्ण करण्यासाठी तांत्रिकदृष्ट्या आवश्यक उपांगास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्यास मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ०८ डिसेंबर, २०२२ रोजीच्या राज्यस्तरीय उच्चाधिकार सुकाणू समितीच्या बैठकीमध्ये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार, अकोला शहराच्या मलनिःस्सारण प्रकल्पाच्या संदर्भाधीन क्र. ३ मधील शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या अधीन राहून परिच्छेद क्र. २ मधील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या प्रकल्पासाठी आवश्यक वाढीव उपांगास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

२. अकोला शहराच्या मलनिःस्सारण प्रकल्पातील उपांगे व त्यांची किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे :-

| **Sr. No.** | **Name of Item** | **Amount** |
|---|---|---|
| 1 | Additional cost for GST Rate Change | 7,45,00,000 |
| | Total | 7,45,00,000 |
| | **Say Rs.** | **7.45 Cr.** |

३. अकोला शहर मलनिःस्सारण प्रकल्पाचा वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे.

(रु.कोटीमध्ये)

| नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५०% ) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या २५ %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या २५ %) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| अकोला महानगरपालिका | ७.४५ | ३.७२५ | १.८६२ | १.८६३ |

४. सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने सर्व तांत्रिक बाबींची पूर्तता करण्याची व वस्तू व सेवा कराच्या बाबींची परिगणना प्रमाणित करूनच देयक अदा करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, अकोला महानगरपालिका यांची राहील.

५. अकोला शहराच्या मलनिःस्सारण प्रकल्पास संदर्भाधीन क्र. ३ मधील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या व त्यानुषंगाने सदर अमृत अभियानाच्या व या प्रकल्पाच्या अनुषंगाने वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या सर्व अटी व शर्तींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, अकोला महानगरपालिका यांचीराहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४०६१३४७०१८६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: cn=SHRIKANT C ANDGE, o=Mantralaya, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, email=shrikant.andge@nic.in, c=US
Date: 2023.04.11 20:21:33 +05'30'

(श्रीकांत आंडगे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) विभाग यांचे खाजगी सचिव.
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक.
५. अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव, पाणीपुरवठा विभाग यांचे स्वीय सहायक.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक.
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय ,मुंबई.

१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
११. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग.
१२. जिल्हाधिकारी, अकोला.
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, अकोला.
१४. आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला.
१५. निवड नस्ती, नवि-३३.